**निसर्ग संरक्षण व वन्यजीव व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या राज्य योजनेंतर्गत विविध कार्यबाबींचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०६.२४/प्र.क्र.११२/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- १४ जून, २०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात एकूण ६१९०७.५ चौ.कि.मी. वनक्षेत्र असून त्याचे भौगोलिक क्षेत्राशी प्रमाण २०.१२ टक्के एवढे आहे. त्याचबरोबर वन्यजीवांचे व त्यांच्या अधिवासाचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ च्या तरतूदीनुसार राज्यामध्ये ५२ वन्यजीव अभयारण्ये, ६ राष्ट्रीय उद्याने व २८ संवर्धन राखीव क्षेत्रे अधिसूचीत करण्यात आली आहेत. तसेच व्याघ्र सवंर्धनाचा महत्वपूर्ण उद्देश विचारात घेता २० संरक्षित क्षेत्रांचा समावेश करुन राज्यात एकूण ६ व्याघ्र प्रकल्पांची निर्मिती करण्यात आली आहे. या व्यतिरिक्त वनक्षेत्रात आढळून येणाऱ्या जैवविविधतेमध्ये दुर्मिळ व मौल्यवन वनस्पतींचा समावेश असून त्यांचे देखील संरक्षण करणे आवश्यक आहे.

वन्यजीव व्यवस्थापनाचा भाग म्हणून वन्यजीवांच्या अधिवासाचे संरक्षण व विकास करण्याकरीता क्षेत्रिय स्तरावर विविध कामे हाती घेण्यात येतात. त्याचबरोबर अलिकडच्या काळात नागरी वस्तीनजीक वन्यजीवांचे शिरण्याच्या घटना निदर्शनास येत असून त्यामुळे प्रसंगी मानव-वन्यजीव संघर्षाची परिस्थिती निर्माण होत आहे. अशा परिस्थितीत मनुष्य हानी टाळणे आणि वन्यजीवांना सुरक्षित ठेवण्यासाठी क्षेत्रिय स्तरावर प्रतिबंधक उपाययोजना करणे आवश्यक ठरते. या दृष्टीने वन्यजीवांचे व त्यांच्या अधिवासाचे संवर्धन करण्यासाठी क्षेत्रिय स्तरावर करण्यात येणाऱ्या उपाययोजनांच्या अंमलबजावणीकरिता निसर्ग संरक्षण व वन्यजीव व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनेच्या कार्यबाबी स्पष्टपणे विनिर्दिष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णयः-**

राज्य योजना "निसर्ग संरक्षण व वन्यजीव व्यवस्थापन (२४०६ ०७७५)" या योजनेंतर्गत खालील कार्यबाबींचा समावेश करण्यात येत आहे :-

**योजनेचे मुख्य उद्दिष्ट :-**

राज्यातील वन्यजीवांचे आणि त्यांच्या अधिवास क्षेत्राचे संवर्धन करणे, नामशेष होणाऱ्या प्रजातींचे जतन करणे व वाढत्या मानव-वन्यजीव संघर्षाच्या घटनांवर परिणामकारक उपाययोजना करणे.

**योजनेंतर्गत समाविष्ट कार्यबाबी :-**

१. वन्यप्राण्यांना त्यांच्या अधिवास क्षेत्रात चारा व पिण्याचे पाणी उपलब्ध करण्यासाठी अधिवास विकासाची कामे करणे - चराई कुरणांचा विकास करणे, उपद्रवी वनस्पतींचे उच्चाटन करणे.
२. वनक्षेत्रातील जलस्त्रोतांमधील गाळ काढणे किंवा त्यांची दुरुस्ती करणे.
३. पाणी टंचाईच्या काळामध्ये वनक्षेत्रात कृत्रिम पाणवठे निर्माण करणे - पाण्याच्या टाक्या लावणे, सौर ऊर्जा पंप बसविणे अथवा पाणवठ्यामध्ये टँकरद्वारे पाणीपुरवठा करणे.

४. नामशेष होणाऱ्या प्रजातींचे त्यांचे अस्तित्व असलेल्या क्षेत्रात संवर्धन करणे - गिधाड संवर्धनासाठी उपाययोजना, समुद्री कासवांच्या संवर्धनासाठी उपाययोजना, माळढोक पक्ष्याच्या संवर्धनासाठी उपाययोजना, इत्यादी.
५. जलद बचाव पथकाचे सक्षमीकरणासाठी आवश्यक उपकरणे, साहित्य उदा. पिंजरे, जाळे, सापळे, बेशुद्धीकरण गन, औषधी, जीपीएस, कॅमेरा ट्रॅप, ड्रोन इत्यादी खरेदी / पुरवठा करणे.
६. नागरी वस्तीनजीक आलेल्या वाघ, बिबट, हत्ती सारख्या वन्यप्राण्यांचा मागोवा घेण्यासाठी प्राथमिक कृती दलाची निर्मिती करणे, बचाव कार्याकरीता आवश्यक मनुष्यबळ व सुविधा पुरविणे.
७. मानव-वन्यजीव संघर्ष उद्भवू नये याकरिता प्रतिबंधक उपाययोजना - कंट्रोल रूमची स्थापना करणे, जनजागृती करणे, कर्मचारी आणि स्थानिकांसाठी कार्यशाळा, प्रात्यक्षिके इत्यादी आयोजित करणे.
८. वनक्षेत्रालगत असलेल्या खाजगी / सार्वजनिक विहीरींना कठडे बांधणे.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांच्या परवानगीने प्राणी / पक्षी गणना करणे.
१०. वन्यजीव व्यवस्थापन उपाययोजना जसे की वन्यप्राण्यांचे स्थलांतरण करणे, संख्या नियंत्रण करण्याचे उपक्रम व इतर
११. संरक्षित क्षेत्रामध्ये संरक्षण कुटी निर्माण करणे, निरीक्षण मनोरे तयार करणे.
१२. संरक्षित क्षेत्रातील रस्त्यांवर रपटे बांधणे, रस्त्यांचे परिरक्षण व विशेष दुरुस्ती करणे (योजनेकरीता अर्थसंकल्पित निधीच्या १०% कमाल मर्यादेत)

**योजनेची अंमलबजावणी**

१. जलद बचाव पथकाचे सक्षमीकरणासाठी आवश्यक उपकरणे / साहित्याचे मानक विनिर्देश (standard specification) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली असलेल्या समितीने निश्चित करून द्यावे. समितीमध्ये प्रादेशिक आणि वन्यजीव वृत्ताचे मुख्य वनसंरक्षक (प्रत्येकी-१), किमान २ उपवनसंरक्षक (प्रादेशिक), १ पशुवैद्यकीय अधिकारी यांचा समावेश असेल व वनसंरक्षक / उपवनसंरक्षक (वन्यजीव-नियोजन व व्यवस्थापन) हे समितीचे सदस्य सचिव असतील. समितीने निश्चित केलेली मानके आर्थिक वर्षामध्ये एकदा सुधारीत करता येतील.
२. जलद बचाव पथकाचे सक्षमीकरणासाठी आवश्यक उपकरणे / साहित्याची उपलब्धता विचारात घेऊन वनवृत्ताकडून संबंधित अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांचे मार्फत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) व शासनाकडे सादर करावा. खरेदी करण्यात आलेल्या साहित्य / उपकरणांची जडवस्तु संग्रह नोंद वहीमध्ये नोंद घेणे बंधनकारक राहील.
३. संबंधित उपवनसंरक्षक / उप संचालक / विभागीय वन अधिकारी यांनी उपलब्ध साहित्याच्या सुचीबाबत (Inventory) प्रमाणपत्र प्रस्तावासह सादर करावे.
४. खरेदी प्रकियेच्या अनुषंगाने वेळोवेळी शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांचे पालन करण्यात यावे.
५. संरक्षण मजुर लावताना शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एलएवी १०९४/प्र.क्र. २५२/फ-६, दिनांक ३१.०१.१९९६ च्या तरतुदीप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१८१४३०१६८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.06.18 14:46:46 +05'30'

**( सिद्धेश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई / पूर्व, नागपूर.
५) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, व्याघ्र प्रकल्प
६) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)
७) सर्व उप वनसंरक्षक / उप संचालक / विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक / वन्यजीव)
८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९) कार्यासन अर्थ-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१०) कार्यासन - १४७५, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई - ३२.
११) कार्यासन- ब- १, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) कार्यासन- फ-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय.